**जनजाती सल्लागार समितीच्या शिफारशीनुसार, ज्या अनुसूचित क्षेत्रात बिगर आदिवांसीची लोकसंख्या ५०% पेक्षा जास्त आहे अशा क्षेत्रातील १००% रिक्त पदे, स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधून भरण्याच्या निर्णयावर पुर्नविचार करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. : बीसीसी -२०१५/ प्र.क्र.२५५A /१५/१६-ब**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: २७ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०७२/जे, दि.६ जून १९७२.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी ११८७/२७७६/सीआर २९६/८७/१६-ब दि.१५ ऑक्टोबर, १९८७.

३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३/१६-ब, दि.१८जून, १९९४.

४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३१६-ब, दि. १ सप्टेंबर, १९९७.

५) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९८/प्र.क्र-११६/९८/१६-ब, दि.२० सप्टेंबर, १९९९.

६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २००१/३५३/प्र.क्र-१४/२०००/१६-ब, दि.१३ ऑगस्ट, २००२.

७) महाराष्ट्र राज्य लोकसेवा (अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, निरधिसूचित जाती (विमुक्त जाती),भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्ग यांच्यासाठी आरक्षण) अधिनियम, २००१

८) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-१/४७४/२०१४,दि.९ जुन,२०१४

९) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-२/४७४/२०१४/७३०, दि.१४ ऑगस्ट,२०१४

१०) शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१४/प्र.क्र.२१३A/१४/१६-ब, दि.३१ जुलै,२०१४

११) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-११०१९(१६)(२०१४)/अधिसूचना-५/११२२/२०१४, दि.३१.१०.२०१४

१२) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-४०९/, दि.०३.०६.२०१५

१३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: बीसीसी-२०१५/प्र.क्र.१०२A/१५ /१६-ब/, दि.९.०१.२०१६

१४) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-१०७९/, दि.०९.०८.२०१६

१५) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१६(६)(२०१४)/अधिसूचना-१५१४/, दि.२३.११.२०१६

<u>प्रस्तावना-</u>

राज्यात शासकीय सेवेमध्ये सरळसेवा पद भरतीमध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी ७ टक्के आरक्षण विहित करण्यात आले आहे.

२. वरील संदर्भाधीन अनु.क्र. १ ते ६ व अनु. क्र. १३ येथील शासन निर्णयान्वये १९७२ पासून व तद्नंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार, पालघर,धुळे,नाशिक,रायगड,नंदुरबार,चंद्रपूर,यवतमाळ व गडचिरोली या आदिवासी बहुल जिल्हयात अनुसूचित जमातीच्या लोकसंख्येच्या आधारे जिल्हा निहाय संवर्गातील गट-क व गट-ड सेवांमधील पदे भरतांना अनुसूचित जमातीसाठी खालील प्रमाणे वाढीव आरक्षण विहित केले आहे. :-

| जिल्हा | पालघर | धुळे | नाशिक | रायगड | नंदुरबार | चंद्रपूर | यवतमाळ | गडचिरोली |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अनुसूचित जमातीसाठी वाढीव आरक्षण | २२% | २२% | २२% | ९% | २२% | १५% | १४% | २४% |

संदर्भाधीन अनु. क्र. ८, ९,११,१२,१४ व १५ येथील अधिसूचनेन्वये मा.राज्यपाल महोदयांनी भारतीय राज्य घटनेच्या पाचव्या सूचीतील परिच्छेद ५ मधील उप परिच्छेद १ नुसार प्रदान केलेल्या अधिकारानुसार, अनुसूचित क्षेत्रामध्ये देण्यात येणाऱ्या विविध सेवा सुविधांच्या दर्जामध्ये सुधारणा करण्याच्या दृष्टीने, अनुसूचित क्षेत्रामधील आदिवासींच्या सर्वांगीण विकासास गती देण्याकरिता, स्थानिक बोली-भाषा आणि संस्कृतीच्या ज्ञानाच्या अभावी निर्माण होणारे संदेशवहनाचे प्रश्न सोडविण्यासाठी, अनुसूचित क्षेत्रामधील विविध संस्थांमध्ये कर्मचारीवृंदाच्या वारंवार गैरहजर राहण्यामुळे निर्माण होणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्याच्या हेतूने आणि अनुसूचित क्षेत्रामध्ये राहणाऱ्या आदिवासींच्या कल्याण व प्रगती करिता शासनामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम आणि योजनांच्या अंमलबजावणीच्या दर्जात सुधारणा करण्याकरिता, अनुसूचित क्षेत्रामधील सरळसेवेने भरण्यात येणारी १) तलाठी, २) सर्वेक्षक, ३) वनरक्षक ४) कोतवाल ५) वननिरीक्षक (महसूल व वन विभाग )६) ग्रामसेवक, ७) शिक्षक,(जिल्हा परिषद) ८) पशुधन विकास पर्यवेक्षक, ९) परिचारिका १० ) बहुद्देशिय आरोग्य कर्मचारी( ग्राम विकास व जलसंधारण विभाग) ११) कृषि सहाय्यक,(कृषि व पदुम विभाग) १२) अंगणवाडी पर्यवेक्षक (महिला व बाल विकास विभाग)१३)स्वयंपाकी १४) आदिवासी विकास निरीक्षक, १५) प्रयोगशाळा परिचर १६)कामाठी १७) शिक्षक (आश्रमशाळा) (आदिवासी विकास विभाग) व १८) पोलीस पाटील (गृह विभाग ) या संवर्गातील रिक्त असलेली पदे स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारांमधूनच भरण्याचे आदेश दिलेले आहेत. सदर अधिसूचनेची अंमलबजावणी करताना, अनुसूचित क्षेत्रातील बिगर आदिवासींवर अन्याय होऊ नये व त्यांच्या असंतोष निर्माण होऊ नये, यास्तव जनजाती सल्लागार समितीने ४९ व्या बैठकीत केलेल्या शिफारशीनुसार विशेषत: ज्या अनुसूचित क्षेत्रामध्ये बिगर आदिवासींची लोकसंख्या ५०% पेक्षा जास्त आहे त्या क्षेत्रातील पदे भरताना, प्रचलित १००% रिक्त पदे स्थानिक आदिवासीमधून भरण्याबाबतच्या मा.राज्यपाल महोदयांना निर्गमित केलेल्या आधिसूचनेतील तरतुदीचा पुनर्विचार करुन सुधारणा सुचविण्यासाठी आणि शासनास शिफारस करण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

त्यास अनुसरुन या शासन निर्णयान्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापना करण्यात येत आहे-

| **अ.क्र.** | **सचिव** | **पदनाम** |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव,गृह विभाग | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव,विधी व न्याय विभाग | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ६. | सचिव,ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ७. | सचिव,कृषि व पदुम विभाग | सदस्य |
| ८. | सचिव,महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| ९. | सचिव,आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| १०. | सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीने मा.राज्यपाल महोदयांना निर्गमित केलेल्या संदर्भाधिन अधिसूचनांचा तसेच अनुसूचित क्षेत्रातील, अनुसूचित जमातीच्या लोकसंख्येचा तालुका निहाय व जिल्हा निहाय अभ्यास करुन, ज्या अनुसूचित क्षेत्रामध्ये बिगर आदिवासींची लोकसंख्या ५०% पेक्षा अधिक आहे त्या-त्या जिल्हयात पदभरतीचे / आरक्षणाचे प्रमाण कशा पध्दतीने निश्चित करावे याबाबत आपल्या शिफारशी ३ महिन्याच्या आत सादर कराव्यात.

३. या शिफारशी जनजाती सल्लागार समितीपुढे ठेऊन, समितीच्या मंजुरीनंतर मा.राज्यपाल महोदयांना पुढील निर्णयार्थ सादर करावयाच्या असल्याने, समितीने विहित मुदतीत शिफारशी सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८२७१६४३१३२४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI RAGHUNATH DAUND

Digitally signed by SHIVAJI RAGHUNATH DAUND
DN: c=IN, o=Personal, 2.5.4.20=cace7d2ea64c6e6543e03a796e1b05a4c28b727e17119e6a62359e3a9136b4be, postalCode=400603, st=MAHARASHTRA, serialNumber=e08a9964fa88914fd0b0956696e822b221982cc926ec215f4b3ac3db9582d97e, cn=SHIVAJI RAGHUNATH DAUND
Date: 2018.08.27 16:44:45 +05'30'

**( शिवाजी दौंड )**
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई-३२.
५) सर्व मा. विधानसभा सदस्य/मा.विधानपरिषद सदस्य/मा.संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३५.
७) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

८) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
१०) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
११) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), म मुंबई.
१२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद) ,मुंबई.
१३) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१४) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५) सर्व सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), महाराष्ट्र राज्य.
१६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई.
१७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
१८) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,नागपूर,औरंगाबाद.
२०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२२) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मंत्रालय, मुंबई-३२.
२३) सचिव,राज्य माहिती आयोग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
२५) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.
२६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२७) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.
२८) संचालक, समाजकल्याण, पुणे.
२९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
३०) संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३१) संचालक, सेवायोजन, मुंबई.
३२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३३) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
३४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३६) सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्त्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना सदर शासन निर्णयाची प्रत, त्यांच्या स्तरावरुन स्वतंत्रपणे पाठवून कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
३७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई. (५ प्रती)
३८) सर्व मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये,महाराष्ट्र राज्य.
३९) निवड नस्ती, कार्यासन १६-ब.